**राज्यातील नागरी क्षेत्रातील अति तीव्र कुपोषित बालकांसाठी (SAM) नागरी बाल विकास केंद्र (यु.सी.डी.सी) योजना सुरु करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांक : एबावि २०१९/प्रक्र.१२९/का-५(E-६९८१२१)
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक : ५ मार्च, २०२४.

**वाचा :** १) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र. एबावि-२०१६/प्र.क्र.४३ भाग १-ब/ का-५, दिनांक ११.०८.२०१७

२) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र. एबावि.२०१६/प्र.क्र.३३१/का-५, दिनांक २६.०९.२०१७

३) केंद्र शासनाच्या दिनांक १९.१०.२०२३ रोजीच्या मार्गदर्शक सूचना

**प्रस्तावना :-**

राज्यात ग्रामीण भागामधील अतितीव्र कुपोषित बालकांच्या कुपोषणावर उपाययोजना करण्याच्या अनुषंगाने अंगणवाडी स्तरावर ग्राम बाल विकास केंद्र (VCDC) ही योजना संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक ११.८.२०१७ अन्वये आदिवासी क्षेत्राकरिता तर शासन निर्णय दि.२६.०९.२०१७ अन्वये बिगर आदिवासी क्षेत्राकरिता सुरू करण्यात आली. त्यानुसार राज्यातील ग्रामीण भागातील SAM बालकांकरिता ग्राम बाल विकास केंद्र (VCDC) कार्यान्वित आहेत.

सद्यःस्थितीत राज्यात नागरीकरणाचे प्रमाण सातत्याने वाढत आहे. नागरीकरण झालेल्या क्षेत्रातील अंगणवाडयांमध्ये अति तीव्र कुपोषित (SAM) बालकांच्या संख्येमध्ये देखील वाढ झाल्याचे दिसून येत आहे. कुपोषणाच्या समस्येवर मात करण्यासाठी ग्रामीण भागातील ग्राम बाल विकास केंद्रांच्या धर्तीवर विशेषत: SAM वर्गवारीत येणा-या बालकांना सर्वसाधारण श्रेणीत आणण्यासाठी नागरी भागामध्ये नागरी बाल विकास केंद्रांची आवश्यकता आहे. त्यानुषंगाने राज्यातील नागरी भागामध्ये SAM बालकांसाठी नागरी बाल विकास केंद्र (UCDC) ही योजना सुरू करण्यास मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील नागरी क्षेत्रातील अंगणवाडयांमध्ये नागरी बाल विकास केंद्र (UCDC) योजना राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार एकात्मिक बाल विकास सेवा योजनेतील राज्यातील १०४ नागरी प्रकल्पांमध्ये सदर योजना राबविण्यात यावी.

२. **योजनेचे स्वरुप व अंमलबजावणी** -

२.१ नागरी बाल विकास केंद्र (UCDC) योजनेमध्ये SAM बालकांना Energy Dense Nutritious Food (EDNF) दिले जाईल. त्याचे composition ग्राम बाल विकास केंद्रामध्ये सॅम बालकांना देण्यात येत

असल्याप्रमाणे म्हणजेच युनिसेफ व जागतिक आरोग्य संघटना (WHO) यांनी दिलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार राहील.

२.२ **प्रशिक्षण:-**

सॅम बालकांची वर्गवारी करण्यासाठी आवश्यक असणारे प्रशिक्षण बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी) यांचेकडून नागरी भागातील सार्वजनिक आरोग्य विभागाच्या/वैद्यकीय शिक्षण विभागाच्या आरोग्य यंत्रणा तसेच महापालिका व नगरपालिका क्षेत्रातील वैद्यकीय अधिकारी व मुख्यसेविका यांच्या प्रशिक्षणाची प्रक्रिया युनिसेफच्या तांत्रिक सल्ल्याने पूर्ण करण्यात येईल.

२.३ **सर्व्हेक्षण:-**

नागरी भागातील महानगरपालिकेच्या किंवा सार्वजनिक आरोग्य विभागाच्या नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र /हेल्थ डिस्पेन्सरी / मॅटर्निटी होम्स या रुग्णालयामधील ए.एन.एम. / नागरी हद्दीतील शासकीय रुग्णालयाचे वैद्यकिय अधिकारी यांनी संबंधित बालक SAM श्रेणीतील (Category) आहे किंवा नाही याबाबत खात्री करावी. त्यानुसार खात्री केलेल्या बालकांची भुक चाचणी घेण्यात येईल. वैद्यकीय भुक चाचणीनुसार उत्तीर्ण बालकांना नागरी बाल विकास केंद्रात दाखल करण्यात येईल व अनुत्तीर्ण बालकांना पुढील उपचारासाठी NRC मध्ये दाखल करण्यात येईल व अशा बालकांना वैद्यकीय उपचार दिला जाईल. त्यानुषंगाने सॅम बालकांच्या स्क्रिनिंग व ट्रिटमेंट संदर्भात वैद्यकीय शिक्षण/आरोग्य विभागाने त्यांच्या अधिनस्थ डॉक्टर, आशा, ANM यांना आवश्यक त्या सुचना द्याव्यात.

२.४ **कुपोषित बालकांची चाचणी**

आठवडयातून दोन वेळा महानगरपालिकेच्या किंवा सार्वजनिक आरोग्य विभागाच्या नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र / रुग्णालयामधील ए.एन.एम./ प्राथमिक आरोग्य केंद्राचे/ शासकीय रुग्णालयाचे वैद्यकिय अधिकारी यांनी नागरी बाल विकास केंद्राला भेट द्यावी व सर्व बालकांची तपासणी/चाचणी करावी. तपासणी / चाचणी अंती बालकाच्या वजनात वाढ/ सुधारणा झाली नसल्याचे निदर्शनास आल्यास अशा बालकास पुढील वैद्यकिय उपचारार्थ CTC/NRC मध्ये दाखल करण्यात यावे.

२.५ **जबाबदार यंत्रणांनी करावयाची कार्यवाही:-**

SAM बालकांना UCDC मध्ये सर्वसाधारणपणे ४ आठवडयापर्यंत व वैद्यकीय शिफारशीनुसार जास्तीत जास्त १२ आठवडयापर्यंत ठेवण्यात यावे. तसेच त्यांना EDNF ची मात्रासुध्दा वैद्यकीय अधिका-यांच्या सल्ल्यानुसार देण्यात यावी. नागरी बाल विकास केंद्रात दाखल झालेल्या बालकांची आठवडयातून दोन वेळा वैद्यकीय अधिकाऱ्यांमार्फत / ANM/ Health Coordinator मार्फत तपासणी करण्यात यावी. अंगणवाडी सेविकांनी पालकांच्या उपस्थितीत बालकांचे दर आठवडयातून एकदा वजन घेऊन, बालकांच्या

वजनात सुधारणा होते आहे किंवा कसे याची नोंद UCDC रजिस्टर मध्ये करावी. याशिवाय महिन्यातून एकदा बालकांची उंची मोजावी. त्यानुसार अंगणवाडी सेविका बालकांची सर्वसाधारण (Normal), मध्यम तीव्र कुपोषित (MAM) आणि अति तीव्र कुपोषित (SAM) अशी वर्गवारी करतील.

२.६ **युसीडीसी प्रोटोकॉल**

नागरी बाल विकास केंद्रामध्ये दाखल होणाऱ्या बालकाच्या बाबतीत सदर शासन निर्णयासोबतच्या **परिशिष्ट क्रमांक -१** मध्ये नमूद केलेल्या प्रोटोकॉलप्रमाणे अंमलबजावणी करण्यात यावी. त्याचप्रमाणे केंद्र शासनाने दि. १९.१०.२०२३ रोजीच्या मार्गदर्शक सुचनान्वये कुपोषणाचे व्यवस्थापनाबाबत दिलेला प्रोटोकॉल विचारात घेऊन आवश्यक ती कार्यवाही करण्यात यावी.

२.७ **अन्नाचे घटक:-**

वैद्यकीय अधिका-यांच्या सल्ल्यानुसार Energy Dense Nutritious Food (EDNF) प्रति बालक किमान १ व कमाल ३ सॅचेट देण्यात येतील. सॅम बालकांना एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत देण्यात येणा-या नियमित पोषण आहाराव्यतिरिक्त Energy Dense Nutritious Food (EDNF) देण्यात यावे. EDNF आहाराचे अन्न घटक खालीलप्रमाणे राहतील-:

| | |
|---|---|
| Vitamin-A | 0.80 to 1.1 mg |
| Vitamin-D | 15.00 to 20.00 mcg |
| Vitamin-E | 20.00 mg |
| Vitamin-C | 50.00 mg |
| Niacin | 5.76 mg |
| pantothenic Acid | 3.04 mg |
| Vitamin-B2 | 1.60 mg |
| Vitamin-B6 | 0.6 mg |
| Vitamin-B1 | 0.50 mg |
| Folic Acid | 200.0 mcg |
| Biotin | 60.00 mcg |
| Vitamin-K | 15 to 30 mcg |
| Vitamin-B12 | 1.63 mcg |
| Potassium | 1100 to 1400 mg |
| Calcium | 300 to 600 mg |
| Phosphorus | 300 to 600 mg |
| Sodium | < 290 mg |
| Magnesium | 80 to 140 mg |
| Zinc | 11.00 to 14.00 mg |
| Iron | 10.00 to 14.00 mg |
| Copper | 1.4 to 1.8 mg |
| Iodine | 70 to 140 mcg |
| Selenium | 20 to 40 mcg |
| n-6 fatty Acid | 3 % to 10% of total energy |
| n-3 fatty Acid | 0.3 % to 2.5% of total energy |
| peanut | 30% |

| | |
|---|---|
| Sugar | 29% |
| Milk solid | 20% |
| Vegetable Oil | 18% |
| Emulsifier (E471), Minerals, Vitamins Antioxidant (E-304, E-306, E 472 C) | as per WHO SPECS |

| **TEST** | **TECHNICAL SPECIFICATIONS** | |
|---|---|---|
| Description | Yellow, light brown to brown coloured paste | |
| Flavour and odour | Pleasing sweet, clean dairy flavour and odour | |
| Net Wt. | 92 g sachet (90.16 g to 93.84 g) | |
| Loss on Drying (105$^0$c for 3 Hrs) | Not more than 2.5 % | |
| Texture | smooth homogeneous texture, free from lumps | |
| Foreign Material | should be free from any foreign matter / impurities | |
| Ash Content | 3.0 to 4.0 % | |
| Moisture Content | 2.5 % Maximum. | |
| Parameter | Label claim per 100 g of product | |
| Energy | 520 to 550 | Kcal |
| Protein | 10 to 12 | g of Total energy |
| Lipids | 45 to 60 | g of Total energy |
| Total Carbohydrates | 45.0 | g |

### ३. आर्थिक निकष

नागरी भागातील सॅम बालकांकरीताच्या नागरी बाल विकास केंद्र (UCDC) या योजनेअंतर्गत खर्चाचे आर्थिक निकष खालील प्रमाणे राहील.

१) नागरी बाल विकास केंद्र (UCDC) ही योजना राज्यातील एकात्मिक बाल विकास सेवा योजनेमधील १०४ नागरी प्रकल्पात राबवावयाची असल्याने या सर्व प्रकल्पातील बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी) यांना सदर योजनेची माहिती संकलित करण्यासाठी प्रशासकीय खर्च म्हणून प्रतिवर्षी रु. २५,०००/- (रुपये पंचवीस हजार फक्त) प्रदान केले जातील.

२) एकूण नागरी प्रकल्प =१०४

३) प्रति नागरी प्रकल्प प्रति वर्ष प्रशासकीय खर्च= २५,००० X १०४= रु.२६,००,०००/-

४) आकस्मिक खर्चाकरिता (औषध उपचारासाठी) बाल विकास प्रकल्प अधिकारी, (नागरी) यांच्या स्तरावर प्रति वर्ष रु.२५,०००/- (रुपये पंचवीस हजार फक्त) इतकी तरतुद ठेवण्यात येईल.

५) एकूण नागरी प्रकल्प =१०४

६) प्रति नागरी प्रकल्प प्रति वर्ष आकस्मिक खर्च= २५,००० X १०४=रु. २६,००,०००/

७) ज्या अंगणवाडी केंद्रात नागरी बाल विकास केंद्र स्थापन करण्यात आलेले आहे. अशा अंगणवाडी केंद्राच्या सेविका व मदतनीस यांना प्रत्येकी प्रति दिन प्रति लाभार्थी रु. ५/- प्रमाणे मोबदला देण्यात येईल.

३.१ UCDC अंतर्गत SAM बालकांकरिता प्रती बालक प्रती दिन खर्चाचा तपशील व वित्तीय निकष पुढीलप्रमाणे आहेत.

| बाब | बाब | प्रति बालक प्रति दिन खर्च (एका तिमाहीकरिता खर्च) | प्रति बालक प्रति दिन खर्च तीन तिमाही धरुन वार्षिक खर्च |
|---|---|---|---|
| A. आहार व मानधन | | | |
| १ | बालकाच्या पोषणासाठी (Energy Dense Nutritious Food ) EDNF दिवसातून किमान १ व जास्तीत जास्त ३ सॅचेट एकूण वजन ९२ ग्रॅम प्रमाणे (रु .२६.८०X ३ सॅचेट) | किमान रु.२६.८०/-<br>कमाल रु.८०.४०/- | -- |
| २ | SAM बालकांची अंदाजित संख्या | १०७१७ | -- |
| ३ | प्रती दिन सॅम बालकाच्या आहारावरील किमान खर्च रु.२६.८०/- व कमाल खर्च ८०.४०/- असा राहील रु.८०.४०/- X १०७१७ | प्रत्यक्ष सर्वेक्षित/प्रमाणित सॅम बालकांच्या प्रमाणात आवश्यक निधी उपलब्ध करुन देण्यात येईल. | -- |
| अ | एका बालकाला प्रतिदिन रु.२६.८०/- या प्रमाणे ७२ दिवस EDNF देण्यासाठी रु.१९२९.६० इतका खर्च येतो, सॅम बालकांची संख्या एकूण १०७१७X१९२९.६० प्रमाणे वार्षिक खर्च | रु. २,०६,७९,५२३.२०/- | रु. २,०६,७९,५२३.२० X ३ = रु.६,२०,३८,५६९.६०/- |
| ब | वरील एकुण बालकांपैकी अंदाजे २० टक्के बालकांना प्रति दिन ३ सॅचेटची आवश्यकता धरुन येणारी २० टक्के बालकांची संख्या २१४३ X २ X २६.८० X ७२ | रु.८२,७०,२६५.६०/- | रु.८२,७०,२६५.६० X ३ =रु.२,४८,१०,७९६.८०/- |
| क | अंगणवाडी सेविका व मदतनीस मोबदला (प्रत्येकी प्रति बालक प्रती दिन रु. ५ प्रमाणे) १०७१७ X १०X७२ | रु.७७,१६,२४०/- | रु.७७,१६,२४० X ३ = रु.२,३१,४८,७२० /- |
| १ | **A. आहार व मानधन** | **रु.३,६६,६६,०२८.८०/-** | **रु. १०,९९,९८,०८६.४०/-** |
| B प्रशासकीय खर्च (वार्षिक स्थिर खर्च) | | | |
| ड | प्रशासकीय खर्च प्रति नागरी प्रकल्प | रु.२५,०००/- | |
| | नागरी प्रकल्पांची संख्या | १०४ | |
| ड | **B.एकूण प्रशासकीय खर्च** | **रु.२६,००,०००/-** | |
| C आकस्मिक खर्च (वार्षिक स्थिर खर्च) | | | |
| १ | आकस्मिक खर्च प्रती वर्ष करिता (प्रति नागरी प्रकल्प) (आकस्मिक खर्चात आकस्मिक उद्भवणाऱ्या अपवादात्मक खर्चांकरिता/ औषधांकरिता सदर तरतूद असेल) | रु.२५,०००/- | |
| २ | नागरी प्रकल्पांची संख्या | १०४ | |
| | **C. एकूण आकस्मिक खर्च** | **रु.२६,००,०००/-** | |
| | **वरील सर्व बाबीवरील एका तिमाहीचा प्रशासकीय खर्च व आकस्मिक स्थिर ठेऊन एकूण अंदाजित खर्च (A+B+C)** | **रु. ४,१८,६६,०२८.८०/-** | |
| | **एकूण अंदाजित वार्षिक खर्च** | -- | **रु. ११,५१,९८,०८६.४०/-** |

(वरीलप्रमाणे खर्चाची परिगणना ही १०७१७ बालके गृहीत धरुन करण्यात आली आहे. प्रत्यक्षात त्या त्या वेळच्या बालकांच्या संख्येनुसार खर्चामध्ये वाढ किंवा घट होऊ शकते.)

४. एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत पुरविण्यात येणारी सेवा आणि महानगरपालिकेचा आरोग्य विभागामार्फत/सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत / वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागामार्फत नियमित चाचणी व आवश्यक औषधांची उपलब्धता यांची सांगड घालून नागरी बाल विकास केंद्र (UCDC) या योजनेची अंमलबजावणी केली जाईल. या बाबतची जबाबदारी संबंधित प्रकल्पाचे बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी) व महानगरपालिकेचे किंवा वैद्यकीय शिक्षण/सार्वजनिक आरोग्य विभागाचे आरोग्य अधिकारी यांची संयुक्तपणे राहील.

५. नागरी बाल विकास केंद्रात SAM बालक दाखल झाल्यानंतर त्याचे अभिलेख तयार करण्याची जबाबदारी अंगणवाडी सेविकेची राहील. अभिलेखामध्ये बालकाचे नांव, जन्मतारीख, सॅम बालकाचे दाखल होण्याचे वजन व त्याची दर आठवडयाला वजनात होणारी वाढ याची संपूर्ण माहिती ठेवणे बंधनकारक राहील. तसेच जे बालक नागरी बाल विकास केंद्रात दाखल झाल्यानंतर सर्वसाधारण श्रेणीत आल्यावर त्याला सुट्टी देण्यात येईल व ते पुन्हा सॅम श्रेणीत आल्यास वैद्यकीय सल्ल्यानुसार पुढील उपचार करण्यात येईल.

६. **समिती-**

नागरी बाल विकास केंद्र या योजनेची प्रभावी अंमलबजावणी होण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | पदनाम | समितीमधील स्थान |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव / सचिव , महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय | अध्यक्ष |
| २ | आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, आयुक्तालय,नवी मुंबई | सदस्य |
| ३ | सहसचिव / उपसचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ४ | युनिसेफचे संस्थेचे पोषण विषयक तज्ञ | सदस्य |
| ५ | संचालक, राजमाता जिजाऊ माता व बाल आरोग्य पोषण मिशन, मुंबई | सदस्य |
| ६ | उपायुक्त, (पोषण) एकात्मिक बाल विकास व सेवा योजना, आयुक्तालय, नवी मुंबई | सदस्य सचिव |

**सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील:-**

१) योजनेवर संनियंत्रण ठेवणे व योजनेचा आढावा घेणे.

२) योजनेच्या प्रभावी अंमलबजावणी करीता आवश्यक ते मार्गदर्शन करणे.

३) योजनेमध्ये कालानुरुप सुधारणा करणे आवश्यक असल्यास त्याकरिता मा. मंत्री, महिला व बाल विकास यांना शिफारस करणे.

७. सदर योजना सन २०२३-२४ या आर्थिक वर्षापासून राबविण्यास मान्यता देण्यात येत असून नागरी भागातील सॅम बालकांना Energy Dense Nutritious food (EDNF) देण्यासाठी पुरवठयाचे दर निश्चित होण्यासाठी निविदा प्रक्रिया पुर्ण करून त्याप्रमाणात आहारावर वरील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे निधी खर्च करण्यात यावा. त्यानुसार सदर योजनेच्या अंमलबजावणीकरीता आवश्यक असलेला अंदाजे वार्षिक खर्च भागविण्याकरीता आवश्यक ती तरतुद आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना उपलब्ध करुन देण्यात येईल.

८. सदर योजनेकरिता नवीन लेखाशीर्ष उघडण्यास मान्यता देण्यात येत असून त्यानुसार सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी आवश्यक असलेला वार्षिक आवर्ती निधी हा राज्यातील नागरी भागातील सॅम बालकांच्या संख्येच्या प्रमाणात आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना उपलब्ध करुन देण्यात येईल.

९. सदर योजना सुरु झाल्यानंतर ३ ते ५ वर्षाच्या कालावधीनंतर योजनेची फलनिष्पती व मुल्यमापनाच्या आधारावर योजना पुढे सुरु ठेवण्याबाबत निर्णय घेण्यात येईल.

१०. सदर शासन निर्णय मा. मंत्रीमंडळाने दि. १०.१.२०२४ रोजीच्या बैठकीमध्ये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२४०३०५०९४०२४२२३० असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2024.03.05 14:09:18 +05'30'

(वि.रा.ठाकूर)

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रलय, मुंबई,
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा. मंत्री, महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई,
६. सर्व मा.मंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
७. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई,
८. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
९. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

११. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई,
१२. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१३. सचिव , बाल हक्क संरक्षण आयोग,मुंबई,
१४. सदस्य सचिव, राज्य महिला आयोग,मुंबई,
१५. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)(लेखापरिक्षा),महाराष्ट्र मुंबई /नागपूर,
१६. सर्व विभागीय आयुक्त,
१७. आयुक्त, महानगरपालिका (सर्व),
१८. सर्व जिल्हाधिकारी,
१९. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
२०. व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, वांद्रे, मुंबई,
२१. सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास विभाग,
२२. सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषद/ नगरपंचायत / नगरपलिका
२३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२५. निवासी लेखा परिक्षण अधिकारी, मुंबई
२६. सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (म. व बा. वि.), जिल्हा परिषद
२७. सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी)
२८. निवड नस्ती (कार्यासन-५).

**शासन निर्णय क्र.एबावि-२०१९/प्र.क्र.१२९/का-५ दि. ५ मार्च,२०२४ सोबतचे परिशिष्ट क्र-१**

**नागरी बाल विकास केंद्राकरीता प्रोटोकॉल**

**१)** अंगणवाडी सेविकांनी पालकांच्या उपस्थितीत बालकांचे दर आठवडयातून एकदा वजन घेऊन, बालकांच्या वजनात सुधारणा होते आहे किंवा कसे याची नोंद UCDC रजिस्टर मध्ये करावी. याशिवाय महिन्यातून एकदा बालकांची उंची मोजावी. त्यानुसार अंगणवाडी सेविका बालकांची सर्वसाधारण (Normal), मध्यम तीव्र कुपोषित (MAM) आणि अति तीव्र कुपोषित (SAM) अशी वर्गवारी करतील.

**२)** नागरी भागातील महानगरपालिकेच्या किंवा सार्वजनिक आरोग्य विभागाच्या नागरी प्राथमिक आरोग्य केंद्र /हेल्थ डिस्पेन्सरी / मॅटर्निटी होम्स या रुग्णालयामधील ए.एन.एम. / नागरी हद्दीतील शासकीय रुग्णालयाचे वैद्यकिय अधिकारी यांनी संबंधित बालक SAM श्रेणीतील (Category) आहे किंवा नाही याबाबत खात्री करावी. त्यानुसार खात्री केलेल्या बालकांची भुक चाचणी घेण्यात येईल. वैद्यकीय भुक चाचणीनुसार उत्तीर्ण बालकांना नागरी बाल विकास केंद्रात दाखल करण्यात येईल व अनुतीर्ण बालकांना पुढील उपचारासाठी NRC मध्ये दाखल करण्यात येईल व अशा बालकांना वैद्यकीय उपचार दिला जाईल.

**३)** सर्व SAM बालकांना नियमित अंगणवाडी आहार कायम ठेवण्यात येईल. याशिवाय अतिरिक्त आहाराच्या स्वरुपात मायक्रोन्युट्रीएन्ट फोर्टीफाईड एनर्जी डेन्स न्युट्रिशियस फुड (EDNF) SAM बालकांना देण्यात येईल. प्रत्येक बालकाला वयानुसार वैद्यकीय अधिकारी एनर्जी डेन्स न्युट्रोशियस फूड (EDNF) डोस निर्धारित करतील. प्रति दिन किमान १ ते जास्तीत जास्त ३ सॅचेट पर्यंत डोसेस असतील, जी बालके SAM आहेत परंतु तीव्र आरोग्य समस्या आहे त्यांना NRC/CTC मध्ये दाखल करण्यात यावे .

**४)** वैद्यकीय तपासणीनंतर भरती करतांना सर्व बालकांना UCDC प्रोटोकॉल प्रमाणे ॲन्टीबायोटीक्स आणि जंतनाशक औषधे व जीवनसत्व-अ वैद्यकीय अधिकारी/ए.एन.एम. मार्फत दिली जातील.

**५)** बालकास नागरी बाल विकास केंद्रात (UCDC) दाखल केल्यानंतर अंगणवाडीच्या कामकाजाच्या वेळेत उपचार केले जातील व त्यानंतर बालकांच्या स्वगृही पालकांमार्फत देखरेख करण्यात येईल. अंगणवाडीच्या वेळेत अंगणवाडीत असलेल्या बालकाला अंगणवाडी कर्मचाऱ्याच्या देखरेखेखाली पोषण आहार देण्यात येईल. वैद्यकीय अधिका-यांच्या सल्ल्यानुसार Energy Dense Nutritious Food (EDNF) प्रति बालक किमान १ व कमाल ३ सॅचेट देण्यात येतील. सॅम बालकांना एकात्मिक

बाल विकास सेवा योजनेंतर्गत देण्यात येणा-या नियमित पोषण आहाराव्यतिरिक्त दिवसातून किमान ३ वेळा Energy Dense Nutritious Food (EDNF) देण्यात यावे.

**६)** SAM बालकांना UCDC मध्ये सर्वसाधारणपणे ४ आठवडयापर्यंत व वैद्यकीय शिफारशीनुसार जास्तीत जास्त १२ आठवडयापर्यंत ठेवण्यात येईल. तसेच त्यांची EDNF ची मात्रासुध्दा वैद्यकीय अधिका-यांच्या सल्ल्यानुसार दिली जाईल. नागरी बाल विकास केंद्रात दाखल झालेल्या बालकांची आठवडयातून दोन वेळा वैद्यकीय अधिकारी / ANM/Health coordinator मार्फत तपासणी करण्यात यावी.

७) SAM बालकांना जास्तीत जास्त १२ आठवडयासाठी नागरी बाल विकास केंद्रात भरती केली जाईल. नागरी बाल विकास केंद्रातून सुट्टी दिल्यानंतर पुढील ६ महिन्यापर्यंत दर आठवडयाला अंगणवाडी सेविका अंगणवाडीमध्ये बालकांचे वजन घेतील व बालकाच्या प्रकृतीवर लक्ष देण्यात यावे.

८) एकात्मिक बाल विकास सेवा योजना आणि नागरी भागातील वैद्यकीय शिक्षण/आरोग्य खात्याचे सर्व अधिकारी व कर्मचारी कालबध्द आणि सुनियोजित पध्दतीने SAM बालकांच्या पालकांचे समुपदेशन करुन बालकांची काळजी घेणे, पोषण आहार, आरोग्य व आहार विषयक चुकीच्या सवयींमध्ये सुधारणा / बदल करण्याबाबत अवगत करतील जेणेकरुन UCDC तून डिस्चार्ज झाल्यानंतर बालक पुन्हा कुपोषणाच्या वर्गवारीत येणार नाही याची काळजी घेण्यात यावी.

******

# शासन निर्णय क्र.एबावि-२०१९/प्र.क्र.१२९/का-५ दि. ५ मार्च,२०२४ सोबतचे परिशिष्ट क्र-२

**UCDC Reporting format for ICDS MPR - Sector- ….................., Project- …............., District- …...............**
**Month and Year - …................**

| अनु. क्र | जिल्ह्या चे नाव | Urban ICDS Project Name (नागरी प्रकल्पा चे नाव ) | पोषण ट्रकर app वर ० ते ६ महिने वयाच्या SAM बालकां ची संख्या | (पोषण ट्रकर app वर ६ महिने ते ५ वर्ष वयाच्या SAM बालकां ची संख्या | अंगणवाडीतील UCDC मार्गदर्शिकेमध्ये दिलेल्या ग्रोथ तक्त्यानुसार ५ ते ६ वर्ष वयोगटातील SAM बालकांची संख्या | HP/RBSK/ UPHC/UCHC (ANM/ Helath post (HP) cordinator, MO HP/RBSK/UPHC/UCHC यांच्या मार्फत वैद्यकीय तपासणी करून घेतलेले ० ते ६ महिने वयोगटातील SAM बालकांची संख्या | (CTC/ NRC /Paediatric ward/ DEIC मध्ये दाखल केलेल्या ० ते ६ महिने वयोगटातील SAM बालकांची संख्या) | | HP/RBSK/ UPHC/UCHC (ANM/ Helath post (HP) cordinator, MO HP/RBSK/UPHC/UCHC यांच्या मार्फत वैद्यकीय तपासणी करून घेतलेले ६ महिने ते ६ वर्ष वयोगटातील SAM बालकांची संख्या) | DEIC (CTC/ NRC /Paediatric ward/ DEIC मध्ये दाखल केलेल्या ६ महिने ते ६ वर्ष वयोगटातील SAM बालकांची संख्या) | | UCDC मध्ये दाखल केलेल्या ६ महिने ते ६ वर्ष वयोगटातील SAM बालकांच्या सुधारणेचा अहवाल | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | ह्या महिन्यात नव्याने दाखल केलेली | (मागील महिन्यातील दाखल केलेली पण ह्या महिन्यात सुरु ठेवलेली | | ह्या महिन्यात नव्याने दाखल केलेली | मागील महिन्यातील दाखल केलेली पण ह्या महिन्यात सुरु ठेवलेली | No. of SAM children improved to Normal category during the last २ months (SAM ते साधारण) | No. of SAM children improved partially to the MAM category during the last २ months (SAM ते MAM) | No. of SAM children continued to be in SAM category during the last २ months (SAM ते SAM) | स्थलांतरण, UCDC सोडून गेलेली, इ. SAM बालकांची संख्या |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ |
| | | | | | | | | | | | | | | | |